**आदिवासी क्षेत्र उपयोजना** / आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना अंतर्गत अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या **"राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम "** या उपशिर्षाखालील सन २०१६-१७ चे प्राप्त केंद्रीय सहाय्य वितरीत करण्याबाबत. **( लेखाशिर्ष क्रमांक- २२१५ ९८५३ ).**

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६ / प्र. क्र. ०६ / कार्यासन.६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - १७ मार्च, २०१७.

वाचा -

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) वि. वि, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५,दि.१०.५.२०१६.
३) केंद्र शासनाचे पत्र क्र.Q-16011/1/2016-Stat/197, दिनांक १७-०२-२०१७.
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. WQ-11021/8/2016- WQ/239,दिनांक १७-०२-२०१७.
५) आ.वि.वि. शासन निर्णय समक्रमांक दिनांक २३ सप्टेंबर, २०१६.
६) आ.वि.वि. शासन निर्णय समक्रमांक दिनांक १८ फेब्रुवारी, २०१७.
७) आ.वि.वि. शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०९ मार्च, २०१७.
८) पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाची नस्ती क्र.राग्रापे- २०१७ / प्र.क्र. ५३ /पा.पु.१०.

**शासन निर्णय-**

आदिवासी उपयोजनांतर्गत मागणी क्र.टी-५, २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०१) पाणी पुरवठा , ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना (०१) (०९) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम ( केंद्रीय हिस्सा) २२१५ ९८५३ मधील ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर), या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षात रु. १३०००.०० लाख़ निधी अर्थसंकल्पित आहे.

केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या योजनेंतर्गत त्यांच्या वाचा क्र. ३ व ४ येथील पत्रान्वये अनुक्रमे Programme fund साठी रु. ४८८.०५ लाख आणि National Water Quality Sub-mission साठी रु.१८.१५ लाख असा एकुण रु. ५०६.२० लाख इतका वितरीत केलेला निधी **राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम ( केंद्रीय हिस्सा) (२२१५ ९८५३ ) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर ) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षात अर्थसंकल्पित रु.१३०००.०० लक्ष निधीतून रु. ५०६.२० लाख (रुपये पाच कोटी सहा लाख वीस हजार फक्त )** इतका निधी या योजनेचे नियंत्रक अधिकारी, प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना खर्चासाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास याद्वारे शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्र व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

३. केंद्र शासनाकडून सदरचा निधी TSP खाली प्राप्त झाला असल्याने तो खर्च करण्याची बाब ही आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत असलेल्या गावांपुरतीच मर्यादीत राहील व तो त्याप्रमाणेच खर्च होईल याची संपूर्ण जबाबदारी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची राहील.

४. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये.

५. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती सबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

६. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्र शासनाला कळविता येईल.

७. उपरोक्त आदेश वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण- २०१६/प्र. क्र. ३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराअंतर्गत तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०५ / अर्थोपाय, दि. ०२-०३-२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०३१६१६२१४३५५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.03.17 16:15:34 +05'30'

**भगवान सावंत**
अवर सचिव.

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई

२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.

४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

६. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.

७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

०९. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१०. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (पापु-१०) मंत्रालय, मुंबई

११. अवर सचिव, कार्यासन-१४, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२. कार्यासन अधिकारी, कार्यासन- २, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१३. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.